जिल्हा परिषदेतील ग्रामसेवक / ग्राम विकास अधिकारी
यांना कायम प्रवासभत्ता मंजूर करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्र. डिएसआर २०१०/प्र.क्र.१७८/आस्था-५**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक: ९.१२.२०११**

**प्रस्तावना:**

ग्रामपंचायतस्तरीय योजना राबविण्याची जबाबदारी ग्रामसेवकांवर आहे. यात **मूलभूत सुविधा** (अंतर्गत रस्ते, बायोगॅस, अपारंपारिक उर्जा, विविध विकास बांधकामे, पाणी पुरवठा, स्वच्छता, घनकचरा व सांडपाणी व्यवस्थापन इ.) **मूलभूत सामाजिक गरजांशी निगडीत योजना** (आरोग्य, शिक्षण पोषण, सामाजिक सुरक्षा) **रोजगार** (नरेगा, राष्ट्रीय जीवनोन्नती अभियान, बचतगट, रुरल मॉल इ.) अशा क्षेत्रांशी निगडीत योजनांचा समावेश आहे. यासाठी ग्रामसेवकांना सातत्याने प्रवास करावा लागतो. सबब, प्रवासभत्ते बीले वेळेवर तयार करुन मंजुरीसाठी सादर करणे कार्यालयीन कर्मचाऱ्यांना शक्य होत नाही. त्यामुळे सदर कर्मचाऱ्यांना ठोक स्वरुपात दरमहा कायम प्रवासभत्ता लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील सर्व जिल्हा परिषदेतील ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी यांना दरमहा रु.११००/- इतका कायम प्रवास भत्ता, जर ग्रामसेवक एखाद्या महिन्यात १५ दिवसांपेक्षा जास्त कालावधीच्या रजेवर असल्यास त्या महिन्याचा प्रवास भत्ता त्यांना अनुज्ञेय होणार नाही, या अटी व शर्तीच्या अधीन राहून दि.१.१.२०१२ पासून वेतनासोबत देण्यात यावा.

२. सदरचा खर्च त्या त्या वर्षीच्या मंजूर अनुदानातून **"२०५३-जिल्हा प्रशासन-०९३-जिल्हा आस्थापना (५) स्थानिक क्षेत्रातील योजना (एक), महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समित्या अधिनियम कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान (आस्थापना अनुदान) (०५) (०१) सुधारित कर्मचारी वर्ग रचना पध्दती (दत्तमत) (मागणी क्र.एल-२) (२०५३०५६५) (योजनेतर) "** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदरचा शासन निर्णय दिनांक १ जानेवारी २०१२ पासून अंमलात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४३६/व्यय-१५, दि.२५.११.२०११ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११२१२०६२८३०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(शरद दळवी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति:

१) विभागीय आयुक्त (सर्व),
२) जिल्हा परिषद अध्यक्ष (सर्व),
३) जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व),
४) जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (सर्व),
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य-१ व २ (मुंबई/नागपूर) (५ ज्यादा प्रतींसह)
६) महालेखापाल (लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य-१ व २ (मुंबई/नागपूर) (५ ज्यादा प्रतींसह)
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,
८) उप मुख्य लेखा परिक्षक , स्थानिक निधी लेखा (सर्व)
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व),
१०) सामान्य प्रशासन विभाग/वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
१२) कार्यासन वित्त-०१/निवड नस्ती/ कार्यासन आस्था-५